**डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे येथील मुला-मुलींचे वसतिगृह, विद्याशाखा वसतिगृह आणि विश्रामगृह इमारतींचे नुतनीकरण करण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र: डीसीआय-२०१९/प्र.क्र.२२/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२३.

<u>वाचा</u> :- १) प्र-कुलसचिव, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे यांचे दि.२४.०१.२०२३ रोजीचे पत्र.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९

<u>प्रस्तावना</u> :- डेक्कन कॉलेज ही संस्था भारतातील तीन जुन्या संस्थापैकी एक आहे. दि.०६.१०.१८२१ रोजी हिंदु कॉलेज नामक संस्था म्हणून अस्तित्वात आली. दि.१५.११.१८६४ रोजी या कॉलेजचे नाव बदलुन डेक्कन कॉलेज असे करण्यात आले. डेक्कन कॉलेज ही संस्था डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था या नावाने दि.१७.०८.१९३९ रोजी शासनाने सुरु केली. तदनंतर ट्रान्सफ़र डीडनुसार डेक्कन कॉलेज पुना ट्रस्टची स्थापना करण्यात आली व संस्थेच्या मालमत्तेची मालकी ट्रस्टकडे सोपवली. डेक्कन कॉलेज हि संस्था सक्षमरित्या चालण्याकरिता परिरक्षण (वेतन व वेतनेतर) अनुदान तसेच आवश्यक विकास निधी देण्याची हमी राज्य शासनाने मा.उच्च न्यायालयाच्या ट्रान्सफर डीडच्या माध्यमातुन घेतेलेली आहे. सदर संस्थेस मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांचेकडून दि.०५.०३.१९९० रोजी अभिमत विद्यापीठाचा दर्जा देण्यात आला आहे. सदर संस्थेस २०० वर्ष पुर्ण झाले आहेत. विद्यापीठातील इमारती १२५ वर्षापुर्वी बांधलेल्या असून, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे येथील मुला-मुलींचे वसतिगृह, विद्याशाखा वसतिगृह आणि विश्रामगृह या इमारतींचे नुतनीकरण करणे आवश्यक आहे. तदनुषंगाने सदर इमारतीचे नुतनीकरण करण्यासाठी रु.३१५.२५ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्याची संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये विनंती केली आहे.

सदर इमारतींच्या नुतनीकरणाची किंमत रु.१५ कोटीच्या मर्यादित असल्याने संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे येथील मुला-मुलींचे वसतिगृह, विद्याशाखा वसतिगृह आणि विश्रामगृह इमारतींचे नुतनीकरण करण्याकरिता रु.३१५.२५ लक्ष किंमतीचे अंदाजपत्रकास (Recapitulation Sheet) मुख्य अभियंता, पुणे यांनी तांत्रिक सहमती दिल्यानुसार रु.३१५.२५ लक्ष किंमतीचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे येथील मुला-मुलींचे वसतिगृह, विद्याशाखा वसतिगृह आणि विश्रामगृह इमारतींचे नुतनीकरण करण्याकरिता तक्ता "अ" मध्ये नमूद केलेल्या रु.३१५.२५ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास (Recapitulation Sheet) मुख्य अभियंता, पुणे यांनी सहमती दर्शविल्यानुसार खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
२. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.

३. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबीच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक.२०१७/प्र.क्र.११/ नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पूर्ण करावीत.

७. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करून द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या संस्थेचा विकास (२२०२ ०९१४), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९ तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२१६१२०१३६९३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO
BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69,
cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.02.16 12:04:48 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. कुलगुरू, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे
३. कुलसचिव, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
५. सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
७. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.

८. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०. नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३)/(व्यय-५) मंत्रालय, मुंबई.
१२. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. मा.प्रधान सचिव. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५. उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.